नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.:अस्थायी-२९२४/प्र.क्र.१३२/ना.पु.१५,**
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२.
**दिनांक ०५ मार्च, २०२५.**

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि, क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१५६/ना.पु.१२, दि.१८.०४.२०२२.
२) शासन निर्णय, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि, क्र.पदनि-११२२/प्र.क्र.१८७/ना.पु.१५, दि.२५.०८.२०२२.
३) शासन निर्णय, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि, क्र. अस्थायी -२९२४/प्र.क्र.१३२/ना.पु.१५, दि.०१.१०.२०२४.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.
५) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचा प्रस्ताव, दि.२७.०२.२०२५.

**प्रस्तावना-**

संदर्भ क्र.१ येथील दि.१८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये विभागाचा सुधारित आकृतीबंध मंजूर करण्यात आला असून, त्यानुसार नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या आस्थापनेवरील शिधावाटप यंत्रणेसाठी नियमित ११२८ पदे व बाह्यस्त्रोताद्वारे २६३ पदे मंजूर करण्यात आली आहेत.

२. संदर्भ क्र.२ येथील दि.२५.०८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये उपरोक्त दि.१८.०४.२०२२ च्या आकृतीबंधात नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या आस्थापनेवरील शिधावाटप यंत्रणेसाठी मंजूर करण्यात आलेल्या पदांची संख्या व पदविभागणी निश्चित करण्यात आली आहे.

३. संदर्भ क्र. ३ दि.०१.१०.२०२४ च्या शासन निर्णयान्वये, शिधावाटप अधिकारी, गट-ब संवर्गातील ४ व सहाय्यक शिधावाटप अधिकारी, गट-क संवर्गातील ७ अशा एकूण ११ अस्थायी पदांना आणि अंशकालीन सफाईगार च्या ५० व अंशकालीन मेहेतर च्या ४९ अशा एकूण ९९ अस्थायी पदांना, अशा एकूण ११० अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२४ ते दि. २८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

४. संदर्भ क्र.४ येथील दि.०३.०३.२०२५ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना **दि.०१.०३.२०२५ ते दि. ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ** देण्याचे अधिकार प्रदान केलेले आहेत.

५. संदर्भ क्र.५ येथील पत्रांन्वये नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांनी शिधावाटप अधिकारी, गट-ब संवर्गातील ४ पदे, सहाय्यक शिधावाटप अधिकारी, गट-क संवर्गातील ७ पदे, अंशकालीन सफाईगार ची ५० पदे व अंशकालीन मेहेतर ची ४९ पदे अशा एकूण **११० अस्थायी पदांना** मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव सादर केला असून सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या आस्थापनेवरील शिधावाटप अधिकारी, गट-ब संवर्गातील ४ पदे, सहाय्यक शिधावाटप अधिकारी, गट-क संवर्गातील ७ पदे, अंशकालीन सफाईगार संवर्गातील ५० व अंशकालीन मेहेतर संवर्गातील ४९ अशा एकूण ११० अस्थायी पदांची आवश्यकता विचारात घेवून, सदरची पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाहीत या अटीच्या अधीन राहून **दि.०१.०३.२०२५ ते दि. ३१.०८.२०२५ पर्यंत** पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**२. शिधावाटप अधिकारी, गट-ब व सहायक शिधावाटप अधिकारी, गट-क संवर्गातील अस्थायी पदांची संख्या खालीलप्रमाणे आहे :**

(१) शिधावाटप अधिकारी, गट-ब संवर्गातील अस्थायी पदांची संख्या खालीलप्रमाणे आहे:

| अ.क्र. | पदाचे नाव | फ परिमंडळ | ग परिमंडळ |
|---|---|---|---|
| १ | शिधावाटप अधिकारी | ०३ | ०१ |
| **एकूण** | | **०४** | |

(२) **सहायक शिधावाटप अधिकारी, गट-क संवर्गातील अस्थायी पदांची संख्या खालीलप्रमाणे आहे:**

| अ.क्र. | पदाचे नाव | फ परिमंडळ | ग परिमंडळ |
|---|---|---|---|
| १ | सहायक शिधावाटप अधिकारी (प्रशासन) | ०३ | ०१ |
| २ | सहायक शिधावाटप अधिकारी (तपासणी) | ०३ | -- |
| **एकूण** | | **०७** | |

(३) उपरोक्त एकूण ११ अस्थायी पदांवरील खर्च संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो "मागणी क्र.एम-२, २४०८-अन्न साठवण व वखार साठवण, १०१ प्रापण व पुरवठा, (०२) शिधावाटप (०२) (०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र, दत्तमत (२४०८००६४) ०१, वेतन " या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**३. अंशकालीन सफाईगार व अंशकालीन मेहेतर संवर्गातील अस्थायी पदांची संख्या खालीलप्रमाणे आहे :**

(१) अंशकालीन सफाईगार ची ५० व अंशकालीन मेहेतर ची ४९ अशा एकूण ९९ अस्थायी पदांची संख्या खालीलप्रमाणे आहे:

| अ.क्र. | पदाचे नाव | प्रधान कार्यालय | परिमंडळ कार्यालय | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | अ | ड | ई | फ | ग |
| १ | अंशकालीन सफाईगार | ०४ | १४ | ०८ | ०९ | ११ | ०४ |
| २ | अंशकालीन मेहेतर | ०३ | १४ | ०८ | ०९ | ११ | ०४ |
| **एकूण = ९९** | | ०७ | २८ | १६ | १८ | २२ | ०८ |

(२) उपरोक्त ९९ अस्थायी पदांवरील खर्च संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो "मागणी क्र.एम-२, २४०८-अन्न साठवण व वखार साठवण, १०१ प्रापण व पुरवठा, (०२) शिधावाटप (०२) (०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र, दत्तमत (२४०८००६४) ०२, मजुरी " या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.: पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०५१७२६३२६८०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

JAGDISH MANIK KHEDKAR

Digitally signed by JAGDISH MANIK KHEDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=bb551fb9794bc66bec3b1d1e67d9d371cf84929ab9fe6c6f1f6c908554cd901d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=87C9F49EEFE8DE748DFC03D64003C379C5F217EF3F6D86E7E73F9826340410B2, cn=JAGDISH MANIK KHEDKAR
Date: 2025.03.05 17:27:35 +05'30'

**( जगदिश मा. खेडकर )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल -१/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
३) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
७) वित्त विभाग(व्यय -४), मंत्रालय, मुंबई.
८) वित्त विभाग(अर्थसंकल्प १९), मंत्रालय, मुंबई.
९) सर्व उपनियंत्रक, शिधावाटप.
१०) निवड नस्ती(ना.पु.१५).